**संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत**
**निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालय यांना**
**पुरस्कार देणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.निर्मल-१००९ /प्र.क्र.१९१/पापु१६**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- २९ ऑगस्ट, २००९.**

वाचा - १) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाचे पत्र क्र.अभियान- १००८/प्र.क्र.१७७/पापु१६, दि. १५ सप्टेंबर, २००८.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण स्वच्छता कार्यक्रमाचा मूळ उद्देश ग्रामीण जनतेचे आरोग्यमान उंचावण्याचा आहे. यास्तव या कार्यक्रमात ग्रामस्थांचा सक्रीय व सातत्यपूर्ण सहभाग मिळविण्यासाठी सन २०००-०१ पासून **संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान व त्या अंतर्गत ऊकृष्ट कार्य करणा-या ग्रामपंचायतींसाठी राष्ट्रसंत तुकडोजी महाराज स्वच्छ ग्राम स्पर्धा** राबविण्यात येत आहे.

स्वच्छतेच्या दृष्य परिणामासाठी जास्तीत जास्त ग्रामपंचायती स्वच्छ होणे आवश्यक आहे. यास्तव, आपल्या कार्यक्षेत्रातील जास्तीत जास्त ग्रामपंचायती स्वच्छ होण्यासाठी प्रयत्न करण्याची चालना पंचायत समित्या व जिल्हा परिषदांना मिळावी या दृष्टीकोनातून सन २००१-०२ पासून **राष्ट्रपिता महात्मा गांधी स्वच्छ पंचायत समिती व स्वच्छ जिल्हा परिषद स्पर्धा** राबविण्यात येत आहे. तसेच शालेय स्वच्छता व आरोग्य शिक्षण यावर मोठ्या प्रमाणात भर देण्यात येऊन सन २००५-०६ पासुन संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत सर्व स्तरावर पात्र असलेल्या ग्रामपंचायतींमधुन स्वच्छ अंगणवाडी व स्वच्छ प्राथमिक शाळांची निवड करून त्यांना अनुक्रमे **सावित्रीबाई फुले स्वच्छ अंगणवाडी व साने गुरूजी स्वच्छ प्राथमिक शाळा स्पर्धा** राबविण्यात येत आहे.

शौचालयाच्या स्वयंस्फूर्त बांधकामास व त्याच्या योग्य वापरास अधिक चालना देण्याच्या दृष्टीकोनातून दि.२३ जुन २००३ रोजी, केंद्र शासनाने स्वच्छ व पूर्णपणे हागंदारीमुक्त होणा-या ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांसाठी "निर्मल ग्राम पुरस्कार योजना" जाहीर केली. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानामुळे स्वच्छतेसाठी जे पोषक वातावरण तयार झाले आहे त्यामुळे महाराष्ट्राने निर्मल ग्राम योजनेत आघाडी घेतली असून हा पुरस्कार मिळविणा-या देशातील एकूण ग्रामपंचायतींपैकी सर्वाधिक ग्रामपंचायती महाराष्ट्रातील आहेत. या पुरस्कार योजनेचा जास्तीत जास्त लाभ घेऊन ग्रामस्थांचे आरोग्य उंचवावे व पुरस्काररुपाने जास्तीत जास्त निधी राज्यातील ग्रामीण विकासासाठी उपलब्ध करून घेण्याच्या दृष्टीने राज्याचा ग्रामीण भाग हागंदारीमुक्त करण्याचा राज्यशासनाचा निर्धार आहे.

संपूर्ण स्वच्छता अभियानांतर्गत शासकिय प्राथमिक शाळा व माध्यमिक शाळांमध्ये मुले व मुलींसाठी स्वतंत्र स्वच्छतागृहांची सुविधा निर्माण करण्यात आली आहे. तसेच अशासकिय प्राथमिक व माध्यमिक शाळेमध्ये संबंधीत संस्थेने स्वच्छतागृहांची सुविधा उपलब्ध करुन देणेची आहे. निर्मलग्राम

पुरस्कार योजनेअंतर्गत सर्व शासकिय व अशासकिय प्राथमिक, माध्यमिक शाळा व महाविद्यालयामध्ये पुरेशी स्वच्छतागृह सुविधा असणे बंधनकारक आहे.

संपुर्ण स्वच्छता अभियानास गती येण्यासाठी विविध घटकांचा सहभाग घेण्यात येत आहे. संपूर्ण स्वच्छता अभियानात प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा व महाविद्यालयातील विद्यार्थी स्वच्छतेचे संदेश आपल्या कुटुंबात तसेच समाजात नेण्याचे महत्वपूर्ण कार्य करतात. प्राथमिक व माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांना 'स्वच्छता दूत' म्हणून तसेच राष्ट्रीय सेवा योजनेतील महाविद्यालयीन विद्यार्थ्यांना 'युवा स्वच्छता दूत' म्हणून प्रशिक्षीत करण्यात आले आहे.

संपूर्ण स्वच्छता अभियानांतर्गत स्वच्छतेची व्याप्ती वाढविण्यासाठी विविध उपक्रम हाती घेण्यांत आलेले आहेत. माध्यमिक शाळा व महाविद्यालय यांनी आपल्याकडील विद्यार्थ्यांना शौचालय बांधण्यास प्रवृत्त केल्यास स्वच्छता अभियानास निश्चितच गती येईल. म्हणून **'निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालय'** ही संकल्पना राबविण्याचे शासनाच्या विचाराधिन होते.

**शासन निर्णय :**

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानात महाविद्यालय व शाळांचा सहभाग व्यापक प्रमाणात मिळविण्यासाठी खालील निकष पुर्ण करणा-या महाविद्यालय व शाळांना **'निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालय'** म्हणून गौरविण्यात येईल.

१) राज्यातील सर्व माध्यमिक शाळा व महाविद्यालयांसाठी ही पुरस्कार योजना असेल.
२) माध्यमिक शाळा व महाविद्यालयातील १०० टक्के विद्यार्थ्यांच्या घरी वैयक्तिक शौचालय सुविधा असणे व त्याचा वापर असणे.
३) शाळा महाविद्यालयातील शिक्षक / कर्मचाऱ्यांच्या राहत्या घरी व मुळ गावी वैयक्तिक शौचालय सुविधा असणे आवश्यक आहे.
४) शाळा/ महाविद्यालयामध्ये विद्यार्थी संख्येनुसार शौचालय व मुतारींची सुविधा असावी (८० ते १०० विद्यार्थ्यांसाठी १ शौचालय व २० ते ४० विद्यार्थ्यांसाठी १ मुतारी या प्रमाणात)
५) शाळा/महाविद्यालयामध्ये मुले व मुलींसाठी स्वतंत्र स्वच्छतागृहाची सुविधा असणे आवश्यक आहे.
६) स्वच्छतागृहामध्ये टाईल्स बसविलेल्या असाव्यात.
७) मुलींसाठीच्या मुतारीमध्ये लेडिज युरिनल पॅन बसविलेले असणे आवश्यक आहे.
८) हात -पाय धुण्यासाठी पाण्याची व्यवस्था असावी.
९) सांडपाण्याचा वापर करुन परसबाग, फळा-फुलांची झाडे, शोभेची झाडे लावुन परिसर सुशोभित करणे.
१०) स्वच्छतागृहासह शाळेचा सर्व परिसर व वर्ग खोल्यांची नियमित स्वच्छता करणे आवश्यक आहे.
११) भिंतीवर स्वच्छतेचे संदेश, चित्रे, सुविचार लिहिलेले असावेत.
१२) स्वच्छता विषयक विविध उपक्रम राबवावेत.

**परिक्षण :**

निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालयांची प्रत्यक्ष तपासणी करुन निवड करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यात यावी.

**अ) निर्मल महाविद्यालयासाठी तपासणी समिती :**

१) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी/ उपमुख्य कार्यकारी अधिकारी (सा.प्र.वि./बालकल्याण)
२) शिक्षणाधिकारी (माध्यमिक)
३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक)
४) जिल्हा समन्वयक, राष्ट्रीय सेवा योजना

**ब) निर्मल माध्यमिक शाळा तपासणी समिती :**

१) उपशिक्षणाधिकारी (माध्यमिक)
२) उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक)
३) गटक्षिणाधिकारी (दुसऱ्या तालुक्यातील)
४) माध्यमिक शाळा मुख्याध्यापक संघटना प्रतिनिधी/ KRC/ स्वयंसेवी संस्था प्रतिनिधी/ संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान पारितोषिक प्राप्त ग्राम पंचायतीचे सरपंच.

**कार्य कालावधी :**

१) दिनांक २ ऑक्टोबर २००९ ते दिनांक ३१ आक्टोबर २००९ अखेर संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत विविध उपक्रमांचे आयोजन करणे.
२) निर्मल माध्यमिक शाळा व निर्मल महाविद्यालय निवडीचे सर्व निकष पूर्ण करणाऱ्या शाळा व महाविद्यालयांनी जिल्हा परिषदेकडे **दि. १० नोव्हेंबर २००९ पर्यंत प्रस्ताव सादर करणे.**
३) मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी आवश्यक समित्यांची स्थापना करुन शाळा व महाविद्यालयांची तपासणी **दि. ३१ डिसेंबर २००९** पर्यंत करणे.
४) समितीने दिलेले अहवाल जिल्हास्तरीत संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियान समितीसमोर ठेवुन पात्र निर्मल शाळा व महाविद्यालयांची निवड करावी. (दि. १ ते १५ जानेवारी २०१० पर्यंत)
५) दि.२६ जानेवारी २०१० रोजीच्या प्रजासत्ताक दिनाच्या समारंभावेळी मा. पालकमंत्री यांच्या हस्ते निर्मल माध्यमिक शाळा व महाविद्यालयांचा गौरव करण्यात यावा.

**पुरस्कार व प्रमाणपत्र:**

सन २००९-२०१० मध्ये प्रायोगिक तत्वावर हा उपक्रम राबविण्यात येईल. राज्यस्तरावरून उपरोल्लेखित निकष पुर्ण करणा-या संबंधित निर्मल माध्यमिक शाळेस रू. १०,०००/- इतक्या रकमेचा पुरस्कार व प्रमाणपत्र देण्यात येईल. तसेच संबंधित निर्मल महविद्यालयास रू. २५,०००/- इतक्या रकमेचा पुरस्कार व प्रमाणपत्र देण्यात येईल.

**बक्षीस रक्कमेचा विनियोग:**

**संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानांतर्गत 'निर्मल शाळा व निर्मल महाविद्यालय'** यांना **मिळालेल्या बक्षीस रकमेचा विनियोग**

या स्वच्छता अभियानांतर्गत प्रत्येक वितरित केलेल्या बक्षीस रकमेचा विनियोग संबंधित शाळा व महाविद्यालयांनी प्रामुख्याने आपल्या शाळा व महाविद्यालयाच्या पाणी व स्वच्छताविषयक विकास कामासाठी करणे आवश्यक आहे.

अभियानांतर्गत होणारा खर्च हा "मागणी क्रमांक वाय-२, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता- ०२ जलनि:स्सारण व स्वच्छता- १०७ मलप्रणाल सेवा- ग्रामीण स्वच्छता- पंचवार्षीक योजनांतर्गत योजना- राज्य योजना- (०४) (०५) संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानाची अंमलबजावणी, प्रचार, प्रसिध्दी व बक्षिस योजना (२२१५ १९८८) ०९, जाहिरात व प्रसिध्दी" या लेखाशिर्षाखाली घालावा.

**सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०८२९१८४००१००१ असा आहे.**

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(अजितकुमार जैन)
**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव.
३) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव.
४) सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई.
६) सर्व विभागीय सचिव मंत्रालय, मुंबई.
७) सर्व जिल्हा परिषद अध्यक्ष.
८) सर्व जिल्हा परिषद महिला व बालकल्याण सभापती.
९) सर्व विभागीय आयुक्त
१०) सर्व जिल्हाधिकारी
११) महासंचालक माहिती व जासंपर्क महासंचालाालय,मंत्रालय,मुंबई.
१२) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
१३) सर्व उपायुक्त (विकास)
१४) सर्व सहाय्यक आयुक्त (विकास)
१५) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी.(पंचायत)
१६) सर्व जिल्हा माहिती अधिकारी.
१७) सर्व गटविकास अधिकारी
१८) ग्रामविकास विभाग
१९) नियोजन विभाग
२१) वित्त विभाग
२२) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
२३) निवडनस्ती.

**पा.पु. व स्व. वि. / पापु-१६**

शौचालयाच्या स्वयंस्फूर्त बांधकामास व त्याच्या योग्य वापरास अधिक चालना देण्याच्या दृष्टीकोनातून दि.२३ जुन २००३ रोजी, केंद्र शासनाने स्वच्छ व पूर्णपणे हागंदारीमुक्त होणा-या ग्रामपंचायती, पंचायत समित्या व जिल्हा परिषदांसाठी "निर्मल ग्राम पुरस्कार योजना" जाहीर केली. संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानामुळे स्वच्छतेसाठी जे

पोषक वातावरण तयार झाले आहे, त्यामुळे महाराष्ट्राने निर्मल ग्राम योजनेत आघाडी घेतली असून हा पुरस्कार मिळविणा-या देशातील एकूण ग्रामपंचायतींपैकी सर्वाधिक ग्रामपंचायती महाराष्ट्रातील आहेत. या पुरस्कार योजनेचा जास्तीत जास्त लाभ घेऊन ग्रामस्थांचे आरोग्य उंचवावे व पुरस्काररुपाने जास्तीत जास्त निधी राज्यातील ग्रामीण विकासासाठी उपलब्ध करून घेण्याच्या दृष्टीने राज्याचा ग्रामीण भाग हागंदारीमुक्त करण्याचा राज्यशासनाचा निर्धार आहे.

लहान मुले ही देशाची भावी नागरिक असुन लहानपणीच त्यांच्यावर चांगले संस्कार झाले तर त्यातुन चांगले नागरिक, पालक तयार होतील. शाळेत/ महाविद्यालयात शुध्द पिण्याच्या पाण्याची सोय असणे, स्वच्छतेच्या सोयी असणे, स्वच्छ व आनंददायी वातावरणात शिक्षण मिळणे हे त्यांचे हक्क असुन आपल्या सवंगड्यात, कुटुबांत रमणे ही त्यांची भावनिक गरज आहे. घरात तसेच शाळेत व महाविद्यालयात स्वच्छतेच्या सवयी अगवळणी पडणे आवश्यक आहे.

संत गाडगेबाबा ग्राम स्वच्छता अभियानात महाविद्यालयांचा व शाळांचा सहभाग व्यापक प्रमाणात मिळविण्यासाठी प्रत्येक महाविद्यालयात व शाळेत स्वच्छतेच्या सुविधा असणे, त्यात शिकणा-या प्रत्येक विद्यार्थ्यांच्या कुटुंबाकडे वैयक्तिक शौचालय असणे व त्याचा नियमीत वापर करणे या बाबीही विचारात घेण्याची गरज आहे. या सर्व बाबी महाविद्यालयात व शाळेत असल्यास त्यांना प्रोत्साहित करण्यासाठी राज्यातील शासकिय महाविद्यालयांना व शाळांना बक्षिस देऊन पुरस्कारित करणे आवश्यक आहे. त्यासाठी निर्मल महाविद्यालय व निर्मल शाळा म्हणून पुरस्कार देण्याचे शासनाच्या विचाराधिन आहे. तथापि याबाबत महाविद्यालय व शाळांच्या पुरस्काराची रक्कम अनुक्रमे रु.१०००० व रु.२०००० ग्राह्य धरल्यास पुरस्काराची एकूण रक्कम अंदाजे रु. १.५ कोटी च्या आसपास होते. परंतु रु.१.५९ कोटी असून त्यापैकी रु.१.०० कोटी राज्य स्तरावरील पुरस्करासाठी व रु.४०.०० लाख बक्षीस समारंभासाठी राखून ठेवण्यात आलेली आहे.